जिल्हा आरोग्य अधिकारी (गट-अ, वर्ग-१), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग या अस्थाई पदास मुदतवाढ.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/ प्र.क्र.१५६/ आरोग्य-४.

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: ११ सप्टेंबर,२०१५.

वाचा

१) **शासन निर्णय, सा.आ.वि.क्रमांकः अपदे-२०१४/ प्र.क्र.१८९/ सेवा-२, दि.१७.०५.२०१४.**
२) **सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-१/वर्ग-१/टे-५/ अस्थाईपदेमुवामिबा/ न.क्र.४४५४-५८/१५, दि.१३.०८.२०१५.**

**प्रस्तावना**

जिल्हा आरोग्य अधिकारी ( गट-अ, वर्ग-१), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग या अस्थाई पदास संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०१४ ते दिनांक २८.०२.२०१५ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर मुदतवाढ संपुष्टात आली असल्याने व सदर पद कार्यालय प्रमुखाचे असून हे पद आरोग्य विषयक कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्याकरीता आवश्यक असल्याने या पदास दिनांक १.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीची मुदतवाढ देण्याबाबत सहसंचालकांनी शासनास विनंती करण्यात आली आहे.

**शासन निर्णय**

जिल्हा आरोग्य अधिकारी ( गट-अ, वर्ग-१) (वेतनश्रेणी-रू.१५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० ), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग या अस्थाई पदास सदर पद ६ महिन्यापेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त असल्याचे आढळून आल्यास अथवा तद् अनुषंगिक बाबींच्या त्रुटी आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांची राहील या अटीच्या अधीन राहून दिनांक १.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर पदावरील खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या मागणी क्रमांक-आर-१ मुख्य लेखाशीर्ष " २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (०१)(०३)-जिल्हा आरोग्य अधिकारी (२२१० ०३६२) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१११७२२१३५९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.09.15 13:03:52 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हपूर.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.
९. वित्त विभाग (व्यय-१३, बीयुडी-८, वित्तिय सुधारणा ), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी/ अवर सचिव ( अर्थसंकल्प/ सेवा-२/सेवा-३),सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).